रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५



# महाराष्ट्र शासन राजपत्र

प्राधिकृत प्रकाशन

गुरुवार, जुलै १७, २००३/आषाढ २६, शके १९२५

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ जून २००३

**मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८.**

क्रमांक एमटीए.१७०३/प्र. क्र. १६/परिवहन-३.---मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८ (१९५८ चा ६५) च्या कलम १३, पोट-कलम २, स्पष्टीकरण-२, खालील बाब क्रमांक (२) व (५) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे हेल्पर्स ऑफ दि हँडीकॅप्ड, कोल्हापूर या संस्थेच्या मालकीचे क्रमांक एमएच. ०९-ए-८०५४ हे नोंदणी चिन्ह असलेले मोटार वाहन केवळ शैक्षणिक व सामाजिक हेतूसाठी वापरण्यात येणार असल्याने सदर वाहनास ही अधिसूचना निर्गमित केल्याच्या दिनांकापासून तीन वर्षांकरिता किंवा सदर संस्थेकडून उक्त हेतूसाठी वापरण्याचे चालू असेल तोपर्यंत, त्यापैकी आधी जे घडेल त्या कालावधीपर्यंत करमाफी देण्यात यावयाचे वाहन म्हणून अधिसूचित करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्र. कृ. सगदेव,**
शासनाचे उप सचिव.